राज्यातील मच्छिमारांना केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत अपघात गट विमा योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या वर्षात तरतूद करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि -१११४/प्र.क्र.२२१/पदुम-१४,**

**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**

**तारीख: ३१ मार्च, २०१५**

वाचा -

१. आयुक्त (मत्स्य) यांचे क्र.मत्स्य/सा/०६११०१/१८/२०१४-१५, दिनांक १७.०३.२०१५ चे पत्र
२. कृषि मंत्रालय, पदुम विभाग, भारत सरकार यांचे क्र. F.No. १२०१२/३/२०१४-Fy (WU), दिनांक ११.९.२०१४ चे पत्र

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय मत्स्यजिवी सहकारी संघ, नवी दिल्ली यांचेमार्फत राबविण्यात येणाऱ्या राज्यातील मच्छिमारांना केंद्र पुरस्कृत अपघात गट विमा योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या वर्षात राज्य हिश्यापोटी अर्थसंकल्पीत असलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय मत्स्यजिवी सहकारी संघ, नवी दिल्ली (फिशकोपफेड) यांचेमार्फत राबविण्यात येणाऱ्या राज्यातील मच्छिमारांना केंद्र पुरस्कृत अपघात गट विमा योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या वर्षात राज्य हिश्शापोटी रु. २५,५०,०००/- ( अक्षरी रुपये पंचवीस लाख पन्नास हजार मात्र ) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदरहू रक्कम राष्ट्रीय मत्स्यजिवी सहकारी सघ, नवी दिल्ली ( FISHCOPFED ) यांना आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी तात्काळ अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. सदरहू रक्कम कोषागारातून काढण्यासाठी प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे व यासाठी आयुक्त, मत्स्यव्यवसाय हे नियंत्रक अधिकारी म्हणून राहतील.

४. वरील खर्च हा "मागणी क्रमांक डी-६, २४०५-मत्स्यव्यवसाय, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०२) योजनांतर्गत योजना, (०२) (०९) फिशकोप (फेड) मार्फत कार्यरत मच्छीमारांकरीता अपघाती गट विमा योजना, (राज्य योजनांतर्गत योजना), (२४०५ ४८८५ ) ३१- सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९२/१५/व्यय-२, दिनांक ३१ मार्च, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१२०५५१२१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin Madhavrao Pawar

Digitally signed by Nitin Madhavrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79d1142b510b75c1201d04efa5ba4e48e243bd2014663c505a44a97e90266500, cn=Nitin Madhavrao Pawar
Date: 2015.04.01 17:13:30 +05'30'

**( नितीन पवार )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. प्रादेशिक उपआयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
३. सर्व सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय
४. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. राष्ट्र मत्स्यजिवी सहकारी संघ, नवी दिल्ली ( FISHCOPFED) ७ सरिता
७. विहार इन्स्टीटयूशनल एरिया, नवी दिल्ली ११० ०७६
८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ मजला,
९. मंत्रालयासमोर, मुंबई
१०.वित्त विभाग ( व्यय-२/ अर्थसंकल्प-१५/ अर्थसंकल्प-३ ) मंत्रालय, मुंबई

**प्रत माहितीकरिता**

१. मा. मंत्री ( पदुम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री ( मत्स्यव्यवसाय ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय, ( पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व
४. मत्स्यव्यसाय विभाग ) कृषि भवन, नवी दिल्ली
५. सचिव, पदुम यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
६. कक्ष अधिकारी ( पदुम-१६ ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती, पदुम-१४